वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग दुसरा, खालील वित्तीय अधिकारांमध्ये सुधारणा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक देयक-०८१७/प्र.क्र.४६१/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ३१ ऑक्टोबर २०१८.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभाग, क्र. संकीर्ण-२०१४/ प्र.क्र.१७८/ प्रशा.-२, दिनांक ०६.०२.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई, यांचे पत्र क्र.पोरुना/ विप्राम/ २९२५/ १७, दिनांक ०८.०८.२०१७.

४) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई, यांचे पत्र क्र.पोरुना/लेखा/वि.-अधिकार-वाढ/२९२५/ १७, दिनांक २८.०८.२०१७.

५) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(७)/(र.-व-का.)/१८५/२०१७, दिनांक २९.०८.२०१७.

६) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई, यांचे पत्र क्र.पोरुना/ लेखा/ वि.-अधिकार-वाढ/२०१७/ ५६४०, दिनांक २९.११.२०१७.

७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(७)/(र.-व-का.)/ २२९/२०१७. दिनांक ०६.१२.२०१७.

८) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई, यांचे पत्र क्र.पोरुना/ लेखा/ वि.अ.प्र./ २०१७-१८/ ८५५, दिनांक २८.०२.२०१८.

९) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(७)/ (र.-व-का.)/ ४२/ २०१८. दिनांक ०६.०३.२०१८.

**प्रस्तावना.**

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक ४५, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५, मधील नियम १६९, याखाली *"आस्थापनेच्या दैनंदिन उपयोगाकरिता आवश्यक असणारे उपकरण, साधनसामग्री आणि उपकरण संच दैनंदिन वापरात ठेवण्यासाठी आवश्यक असलेले (बांधकामासाठी आवश्यक असलेल्या भांडाराव्यतिरिक्त) उपभोग्य (कंज्युमेबल) भांडार सामान विकत घेण्यास मंजूरी देणे (शासकीय वाहनांचा/स्टाफ कारचा यात अंतर्भाव राहणार नाही)"* वित्तीय शक्तीच्या बाबतीत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, पुढीलप्रमाणे आहेत:-

| अ.क्र.<br>(१) | अधिकार वापरण्यास सक्षम प्राधिकारी<br>(२) | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा<br>(३) |
|---|---|---|
| १. | प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार |
| २. | विभाग प्रमुख | प्रतिवर्ष रु.२,००,०००/- पर्यंत |
| ३. | प्रादेशिक कार्यालय प्रमुख | प्रतिवर्ष रु.२,००,०००/- पर्यंत |
| ४. | कार्यालय प्रमुख | प्रतिवर्ष रु.१,००,०००/- पर्यंत |

२. बृहन्मुंबईतील पोलीस रुग्णालये व दवाखाने यांच्याकरिता लागणारी औषधी, रसायने व इतर वैद्यकीय साधनसामग्री खरेदी करण्यासाठी येणारा खर्च विचारात घेता पोलीस शल्य चिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, यांना कार्यालय प्रमुख म्हणून आणि पोलीस सह-आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांना विभाग प्रमुख म्हणून असलेले वित्तीय अधिकार फारच कमी आहेत. त्यामुळे उक्त रुग्णालये व दवाखाने यांमध्ये दैनंदिन उपयोगाच्या औषधी, रसायने व इतर वैद्यकीय साधनसामग्री यांच्या खरेदीसाठी वारंवार प्रशासनिक विभागाच्या (गृह विभाग) मंजुरीसाठी प्रस्ताव सादर करण्यात येतात. उक्त औषधी, रसायने व इतर वैद्यकीय साधनसामग्री ह्या आकस्मिक उपयोगाच्या वस्तु असल्याने त्यांची खरेदी ही बरेचदा तातडीने करावी लागते. म्हणून, उक्त औषधी, रसायने व इतर वैद्यकीय साधनसामग्री आणि रुग्णांच्या आहारासाठी लागणारे खाद्यपदार्थ यांची खरेदी करण्याच्या प्रयोजनासाठी उक्त कार्यालय प्रमुख व विभाग प्रमुख यांच्या वित्तीय अधिकारांच्या मर्यादा वाढविण्याबाबत पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

**३.** शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभाग, क्र. संकीर्ण-२०१४/ प्र.क्र.१७८/ प्रशा.-२, दिनांक ०६.०२.२०१५, द्वारे वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या वित्तीय अधिकारांच्या मर्यादा वाढविण्यात आलेल्या आहेत.

**४.** पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांचा प्रस्ताव आणि उक्त पूर्वोदाहरण विचारात घेऊन शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय.**

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-दुसरा, याखाली *"शासकीय रुग्णालयात उपयोग होणाऱ्या औषधी सर्जिकल/बाबींचा पुरवठा तसेच प्रयोगशाळांना लागणारी रसायने, रुग्णांच्या आहारासाठी लागणारे खाद्यपदार्थ शासनाने ठरवून दिलेल्या दराने खरेदी करणे"* या वित्तीय शक्तीच्या बाबतीत, यासोबतच्या जोडपत्रातील तक्त्यातील स्तंभ (२) मधील सक्षम प्राधिकाऱ्यांच्या वित्तीय शक्तीच्या मर्यादांमध्ये, स्तंभ (४) मधील अटींच्या

अधीन, स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे सुधारणा करण्यास, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त वित्तीय शक्तीचा वापर करताना संबधित सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आदेश निर्गमित करण्यात आले आहेत असा स्पष्ट उल्लेख प्रत्येक मंजूरी आदेशात करण्यात यावा. तसेच, एखाद्या प्रकरणात स्तंभ (४) मधील अटींची पूर्ति होत नसल्यास अशा प्रकरणात वित्त विभागाची मंजुरी घेण्यात यावी.

३. उक्त वित्तीय शक्तीच्या बाबतीत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र. ४५, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ मधील परिच्छेद १६९, अन्वये वित्तीय अधिकारांचा वापर अनुज्ञेय ठरणार नाही.

४. हा शासन निर्णय अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७५/२०१८, दिनांक १०.०९.२०१८, अन्वये वित्त विभागाच्या (वित्तीय अधिकार प्रदान समिती) मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८११०११०५८४८५२२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: CN = Swapnil Gopal Borse, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2018.11.01 11:08:46 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, वित्त व नियोजन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), वित्त व नियोजन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) पोलीस सह-आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई.
१३) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१८) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१९) कार्यासन अधिकारी (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड फाईल, पोल-७.

## जोडपत्र

*(शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक देयक-०८१७/प्र.क्र.४६१/पोल-७, दिनांक ३१ ऑक्टोबर २०१८ याचे जोडपत्र.)*

**वाचा**:-वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग दोन, अ.क्र. ४५, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ मधील नियम १६९.

**वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, भाग दुसरा.**

*(महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम , १९६५, खाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार)*

| वित्तीय शक्तीचे वर्णन (१) | अधिकार वापरण्यास सक्षम प्राधिकारी (२) | वित्तीय शक्तीची मर्यादा (३) | अटी (४) |
|---|---|---|---|
| शासकीय रुग्णालयात उपयोग होणाऱ्या औषधी सर्जिकल/ बाबींचा पुरवठा तसेच प्रयोगशाळांना लागणारी रसायने, रुग्णांच्या आहारासाठी लागणारे खाद्यपदार्थ शासनाने ठरवून दिलेल्या दराने खरेदी करणे. | **प्रशासनिक विभाग**- अपर मुख्य सचिव, गृह विभाग. | पूर्ण अधिकार | शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.४५, नियम क्र.१६९, स्तंभ (६), मधील अटी. |
| | **विभाग प्रमुख**- पोलीस सह आयुक्त (प्रशासन), पोलीस आयुक्त यांचे कार्यालय, बृहन्मुंबई. | रु.२० लक्ष दरमहा | |
| | **कार्यालय प्रमुख**- पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई. | रु.१० लक्ष दरमहा | |

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: CN = Swapnil Gopal Borse, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2018.11.01 11:09:01 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**